**राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात प्रशासकीय प्रशिक्षणासाठी लेखाशीर्ष (२०७० ०८५३), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) याखाली निधी वितरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः टीआरएन २०२३/ प्र.क्र.४० /२३/१२-अ**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २८ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि.२३.९.२०११.
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३.
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टीआरएन-२०२३/ प्र.क्र.४०/२३/१२-अ, दि.१३.१२.२०२३
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टीआरएन-२०२३/ प्र.क्र.४०/२३/१२-अ, दि. २१.०२.२०२४
५. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टीआरएन-२०२३/ प्र.क्र.४०/२३/१२-अ, दि. ०७.०३.२०२४
६. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टीआरएन-२०२२/ प्र.क्र.६३/२२/१२-अ, दि. १८.०३.२०२४
७. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टीआरएन-२०२३/ प्र.क्र.४०/२३/१२-अ, दि. २०.०३.२०२४
८. महासंचालक, यशदा पुणे यांचे क्र. राप्रनिमूयं/२०२३-२४/ KRA उद्दिष्टे/प्र.क्र.०२-३४३-B, दि. २१.०३.२०२४ रोजीचे चे पत्र.
९. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टीआरएन-२०२३/ प्र.क्र.४०/२३/१२-अ, दि. २६.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात प्रशासकीय प्रशिक्षणाच्या खर्चाकरिता मागणी क्र. ए-४, लेखाशीर्ष (२०७० ०८५३) ३१- सहायक अनुदाने(वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु. ४०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. त्यानुसार सन २०२३-२४ आर्थिक वर्षासाठी यशदा पुणे, तसेच विभागीय व जिल्हास्तरीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांमध्ये एकूण ४८,६८१ प्रशिक्षणार्थीच्या प्रशासकीय प्रशिक्षणासाठी रु ३९९९.४३ लाख ( रुपये एकोणचाळीस कोटी, नव्याण्णव लाख, त्रेचाळीस हजार फक्त) इतक्या रकमेच्या प्रशिक्षण आराखड्यास

उपरोक्त संदर्भधीन क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता तसेच संदर्भधीन क्र. ७ च्या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रशिक्षण आराखड्यानुसार यशदा, पुणे यांनी संदर्भ क्र.८ च्या पत्रान्वये प्रशिक्षण संस्थांनी सदर आर्थिक वर्षात एकूण २१,६२४ प्रशिक्षणार्थ्यांना प्रशिक्षण देण्यात आल्याचे कळविले आहे. त्यापैकी १९,६१६ प्रशिक्षणार्थींच्या प्रशिक्षणासाठी संदर्भ क्र. ३, ४, ५, ७ व ९ च्या शासन निर्णयान्वये **रु.२३६७.५५६५ लक्ष** इतका निधी प्रशिक्षण संस्थांना वितरित करण्यात आला आहे. तसेच सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मंजूर प्रशिक्षण आराखड्याव्यतिरिक्त आयोजित करण्यात आलेल्या अतिरिक्त प्रशिक्षण कार्यक्रमासाठी संदर्भ क्र. ६ च्या शासन निर्णयान्वये रु.४३२.०१९ लक्ष इतका निधी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरित करण्यात आला आहे. आतापर्यंत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात एकूण रु.२७९९.५७५५ लक्ष इतका निधी प्रशिक्षण संस्थांना वितरीत करण्यात आला आहे. सद्यस्थितीत बीम्स प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीतून सदर आर्थिक वर्षात आयोजित करण्यात आलेल्या उर्वरित प्रशिक्षणार्थींच्या प्रशिक्षण खर्चासाठी निधी वितरित करण्याची बाब विचाराधीन आहे .

## शासन निर्णय:-

राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा पुणे, तसेच विभागीय व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांना माहे मार्च २०२४ च्या मासिक प्रगती अहवालनुसार प्रशासकीय प्रशिक्षण आयोजनाच्या खर्चासाठी **खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार एकूण रु.५७.२८५ लक्ष (अक्षरी रुपये सत्तावन्न लक्ष अठ्ठावीस हजार पाचशे फक्त)** इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवरून यशदा, पुणे यांना वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | यशदास्तरावरील प्रशासकीय प्रशिक्षण कार्यक्रम | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र | प्रशिक्षणाचा प्रकार | प्रशिक्षण कालावधी (दिवस) | Online/ In-class/ Blended | प्रशिक्षण शुल्क | प्रशिक्षणार्थी साध्य | एकूण प्रशिक्षण दिवस | खर्च (रु. कोटीत) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | पायाभूत प्रशिक्षण संवर्ग अ | ३० | In-class | २००० | ७३ | २१९० | ०.४३८० |
| २ | नवीन विषयाची तोंड ओळख | ०१ | Online | ७५० | १७९८ | १७९८ | ०.१३४८५ |
| **एकूण A** | | | | | **१८७१** | **३९८८** | **०.५७२८५** |

उपरोक्त विवरणपत्रात नमूद **रु.५७.२८५ लक्ष (अक्षरी रुपये सत्तावन्न लक्ष अठ्ठावीस हजार पाचशे फक्त)** इतका खर्च “मागणी क्र. ए-४, २०७०-इतर प्रशासकीय सेवा ०० - ००३ - प्रशिक्षण ०० - १० - राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात येईल.

**सदर निधी बिम्स प्रणालीवर वितरित करण्यासाठी सहसचिव/उपसचिव (प्रशिक्षण), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई (A ००१७) हे नियंत्रक अधिकारी आहेत. सदर निधी यशदा, पुणे स्तरावर आहरीत तसेच नियंत्रित करण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग ज्ञापन क्र. यशदा-२०१३/प्र.क्र.९०/१३/१२-अ, दि.१५.०२.२०१४ नुसार प्राध्यापक तथा वित्तीय सल्लागार, यशदा यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, यशदा (२२०१०००१२१) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात आले आहे.**

सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदानाची रक्कम संबंधित कोषागारातून काढण्यात आल्यानंतर महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करून घ्यावी तसेच खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. यशदा, पुणे या

संस्थेने उपरोक्त अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करून देईल.

यशदा, पुणे या संस्थेने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ यथील शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र. ७ मध्ये नमूद केल्यानुसार कोषागार अधिकारी यांना देयक सादर करताना संस्थेचे मागील महिन्यातील बँक अकाऊंट स्टेटमेंट (Bank Account Statement) देयकासोबत जोडण्यात यावे.

सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. २८६/व्यय ४, दि. २८/०३/२०२४ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३ नुसार विहित केलेल्या अटींची पूर्तता होत असल्याने तसेच सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८१७३१०६६४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SMITA PRASAD JOSHI

Digitally signed by SMITA PRASAD JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISRTATION DEPARTMENT, 2.5.4.20=d759e39e5163375d3782e5f6bef7edf6a25c72797123cdaa86acd09edf52baf1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=28AA5752FA66D3A7FDEAFB1F4AB24CD90FD9D667A6880CB8CCECA18276150ACA, cn=SMITA PRASAD JOSHI
Date: 2024.03.28 17:40:54 +05'30'

**( स्मिता जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
३. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
४. संचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
५. लेखा अधिकारी, यशदा, पुणे.
६. अवर सचिव, नियोजन विभाग, १४४३, मंत्रालय, मुंबई -३२
७. अवर सचिव, वित्त विभाग ( व्यय-४/ अर्थसंकल्प-१४) मंत्रालय, मुंबई -३२
८. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन -२५
९. संचालक / प्राचार्य, सर्व विभागीय व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था,
१०. अपर मुख्य सचिव ( सेवा ), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
११. निवड नस्ती, कार्यासन-१२-अ.